**कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील "मुख्य अग्निशमन अधिकारी" व "उप मुख्य अग्निशमन अधिकारी" या पदांसाठी सुधारित सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१ मध्ये अंशत: सुधारणा करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- कडोंम-१०२३/सं.क्र.२४६१/प्र. क्र.१२८/नवि-२८**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ०७.०६.२०२४

**वाचा:-** १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. कडोंम-१०१९/प्र.क्र.१३९/नवि-२८, दि.०१.०६.२०२१
२) कल्याण-डोंबिवली महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र. १२८, दि.०१.११.२०२३
३) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे पत्र क्र. कडोंमपा/साप्र/मुका/टे.-९/२९७१, दि.०७.११.२०२३

**प्रस्तावना:-**

कल्याण-डोंबिवली महानगरपालिका सुधारित सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम,२०२१ यांस संदर्भीय क्र. १ येथील, दि.०१.०६.२०२१ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. सदर सेवाप्रवेश नियमात कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अग्निशमन विभागातील पदांकरीता नेमणूकीसाठी शैक्षणिक अर्हता व पात्रता विहीत करण्यात आलेली आहे.

२. कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या सेवाप्रवेश नियमांमध्ये मंजूर केलेल्या अग्निशमन विभागातील पदांपैकी "मुख्य अग्निशमन अधिकारी" व "उप मुख्य अग्निशमन अधिकारी" या पदांसाठी सुधारित सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१ मध्ये अंशत: सुधारणा करण्याबाबत, आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांनी संदर्भीय दि.०७.११.२०२३ च्या पत्रान्वये प्रस्ताव शासनाकडे मान्यतेसाठी सादर केला आहे.

कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवर, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका सुधारित सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१ मध्ये, अग्निशमन विभागातील विविध पदांकरिता शैक्षणिक अर्हता, भरती प्रमाण/नेमणूकीची पध्दतीसंदर्भात सेवा प्रवेश नियमात तरतूद करण्यात आलेली आहे. तथापि, महानगरपालिकेतील कर्मचाऱ्यांना पदोन्नतीच्या संधी उपलब्ध होत नसल्याने, "मुख्य अग्निशमन अधिकारी" व "उप मुख्य अग्निशमन अधिकारी" पदांच्या नेमणूक अर्हतेत सुधारणा करणे गरजेचे आहे. यास्तव, महानगरपालिकेच्या सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१ मधील तरतूदी पाहता, संदर्भीय दि.०१.०६.२०२१ च्या शासन निर्णयासोबतच्या "परिशिष्ट-२" मध्ये क्र. ९२ वर, 'मुख्य अग्निशमन अधिकारी' (श्रेणी-१, अग्निशमन सेवा) व क्र. ९३ वर 'उप मुख्य अग्निशमन अधिकारी' (श्रेणी-२, अग्निशमन सेवा), या २ संवर्गातील पदाच्या नेमणूकीकरीता अर्हता व नेमणूकीच्या पध्दतीसंदर्भात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय:-**

संदर्भीय दि.०१.०६.२०२१ च्या शासन निर्णयासोबतच्या "परिशिष्ट-२" मधील क्र. ९२ वर, 'मुख्य अग्निशमन अधिकारी' (श्रेणी-१, अग्निशमन सेवा) व क्र. ९३ वर 'उप मुख्य अग्निशमन अधिकारी' (श्रेणी-२, अग्निशमन सेवा), या २ संवर्गाच्या अर्हता व नेमणूकीच्या पध्दतीत, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५४, ४५५ व ४६५(१)(ल) अन्वये प्राप्त अधिकारात, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका सुधारित सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१ मध्ये अंशत: सुधारणा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. अग्निशमन विभागातील

विविध पदांकरिता शैक्षणिक अर्हतेत व पात्रतेत सोबत जोडलेल्या “परिशिष्ट-२, अनुसूची-अ” अन्वये सुधारणेस मंजूरी देण्यात येत आहे.

२. या नियमास “कल्याण-डोंबिवली महानगरपालिका सुधारित सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१” चा सुधारित भाग असे संबोधण्यात यावे.

३. सदर सुधारित नियम, आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांनी तात्काळ शासन राजपत्रात प्रसिध्द करावेत. हे नियम शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. या आदेशानुषंगीक सर्व सांविधानिक बाबींची पूर्तता आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांनी करावयाची आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०६०७१४३००४२९२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHILA DHONDIRAM PAWAR

Digitally signed by SUSHILA DHONDIRAM PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=be0660f27b88fa30c14d66b8296a2c28478562c6fd9d1d360094fe11409501d5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D78E8AB53FB3619E69D852CE1492593ABC1DCE1DF4E081AFE790194FB65C97B, cn=SUSHILA DHONDIRAM PAWAR
Date: 2024.06.07 14:44:43 +05'30'

**( सुशिला पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
३) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) उप सचिव (नवि-२८), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती ( नवि-२८ ).

**शा.नि.क्र.कडोंम-१०१९/प्र. क्र.१३९/नवि-२८, दि. ०७.०६.२०२४ सोबतचे "परिशिष्ट-२, अनुसूची-अ"**

| अ.क्र. | पदनाम व श्रेणी | टक्केवारी | कल्याण-डोंबिवली महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१ मधील तरतूद | नेमणूकीकरीता अर्हता व नेमणूकीच्या पध्दतीत सुधारणा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| ९२ | मुख्य अग्निशमन अधिकारी (श्रेणी-१, अग्निशमन सेवा) | पदोन्नती- १००% | कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उप मुख्य अग्निशमन अधिकारी या पदावर किमान ३ वर्ष सेवा पूर्ण झालेल्या व मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी धारण करणाऱ्या अधिकाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. | कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उप मुख्य अग्निशमन अधिकारी या पदावर किमान ३ वर्ष सेवा पूर्ण झालेल्या अथवा उप मुख्य अग्निशमन अधिकारी या पदावर कार्यरत उमेदवार उपलब्ध नसल्यास अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किमान १० वर्ष सेवा पूर्ण झालेल्या व मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी, राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय यांचा विभागीय अधिकारी पाठ्यक्रम उत्तीर्ण अधिकाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| | | प्रतिनियुक्ती | पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध होत नसल्यास, सदर अधिकारी उपलब्ध होईपर्यंत, केंद्र/राज्य/निमशासकीय/स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या सेवेतील समकक्ष पद किंवा ३ वर्षांपासून धारण करणाऱ्या अग्निशमन सेवेतील अधिकाऱ्यामधून प्रतिनियुक्तीच्या धोरणानुसार प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. | |
| ९३ | उप मुख्य अग्निशमन अधिकारी (श्रेणी-२, अग्निशमन सेवा) | पदोन्नती- १००% | कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किमान ३ वर्ष सेवा पूर्ण झालेल्या व मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी धारण करणाऱ्या अधिकाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. | कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किमान ३ वर्ष सेवा पूर्ण झालेल्या अथवा अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर कार्यरत उमेदवार उपलब्ध नसल्यास उप अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किमान १० वर्ष सेवा पूर्ण झालेल्या व मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी, राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय यांचा विभागीय अधिकारी पाठ्यक्रम उत्तीर्ण अधिकाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |

**************************************************